.

महाराष्ट्र ग्राहक संरक्षण व मार्गदर्शन निधी
नियम १९९२ नुसार निधी व्यवस्थापन समितीतील
अशासकीय सदस्यांच्या नियुक्ती बाबत....

# महाराष्ट्र शासन
## अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग
## शासन निर्णय क्रमांकः ग्राकनि-१६१५/प्र.क्र.१०३ /ग्रासं-२

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२
तारीख: ०१ डिसेंबर, २०१८.

वाचा-

१) महाराष्ट्र ग्राहक संरक्षण व मार्गदर्शन निधी नियम, १९९२ मधील नियम ८.

२) शासन निर्णय क्रमांकः .ग्राकनि-१६१५/प्र.क्र.१०३ /ग्रासं-२ दिनांक १२ एप्रिल,२०१६.

प्रस्तावना-

राज्यातील ग्राहकांमध्ये जनजागृती करण्यासाठी स्वयंसेवी संस्थामार्फत विविध कार्यक्रम आयोजित केले जातात. लोकांमध्ये ग्राहक चळवळीचा प्रचार व प्रसार करण्याच्या दृष्टीकोनातून पोस्टर्स लावणे, चर्चासत्र/कार्यशाळा आयोजित करणे, पथनाटय, भारुडे, लोकनृत्य सादर करणे तसेच पदयात्रा, सायकल रॅलीज आयोजित करण्यासाठी स्वयंसेवी संस्थांना शासनाकडून अनुदान उपलब्ध करुन देण्यात येते.

वरील प्रमाणे पात्र संस्थांना अर्थसहाय्य करण्यासाठी शासनाने ग्राहक कल्याण निधी स्थापन केला असून त्याबाबतचे नियम दिनांक २०.११.१९९२ च्या राजपत्रामध्ये प्रसिध्द करण्यात आले आहेत. या निधी नियमाच्या उप नियम ८ अन्वये निधीचे व्यवस्थापन करण्यासाठी “निधी व्यवस्थापन समिती” स्थापन करण्याची तरतुद आहे. त्यानुसार संदर्भाधीन क्रमांक २ येथील **दिनांक** १२ एप्रिल,२०१६ च्या शासन निर्णयानुसार नियुक्त करण्यात आलेल्या स्वयंसेवी ग्राहक संघटनांच्या दोन प्रतिनिधींची मुदत संपुष्टात आली आहे. त्यामुळे त्या दोन अशासकिय सदस्यांऐवजी नव्याने दोन अशासकिय सदस्य निधी व्यवस्थापन समितीवर नेमण्याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय-

उपरोक्त नमुद केल्यानुसार महाराष्ट्र ग्राहक संरक्षण व मार्गदर्शन निधी नियम, १९९२ च्या नियम ८ मधील तरतुदीनुसार निधी व्यवस्थापन समितीवर पुढील २ अशासकीय सदस्यांची नियुक्ती करण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्यांचे नाव व पत्ता | समितीवरील पद |
|---|---|---|
| १ | श्री. जोशी ओंकार सितारामपंत, १० बी, ग्रीनपार्क अपार्टमेंट, क्रांतीचौक उद्यानामागे, क्रांतीचौक, उस्मानपुरा, औरंगाबाद-४३१ ००५. | सदस्य |
| २ | श्री. पुरुषोत्तम सांभ अमिलकंठवार, सरस्वती सदन, रंगार गल्ली, गणपती मंदिराजवळ, नांदेड. | सदस्य |

उपरोक्त अशासकीय सदस्यांची नियुक्ती हा शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून दोन वर्षे इतक्या कालावधीसाठी राहील. या समितीवरील अशासकीय सदस्यांना मुंबई नागरी सेवा नियम खंड २ मधील परिशिष्ट ४२ (अ) विभाग १ मधील तरतुदीनुसार शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक प्रवास-१०१०/प्र.क्र.२/सेवा-५, दिनांक ३ मार्च, २०१० च्या अनुषंगाने प्रवास/दैनिक भत्ता मंजूर करण्यात येईल. या नियमाच्या तरतुदी केवळ रेल्वे/रस्ता प्रवासासाठी लागु असल्याने, समितीवरील नियुक्त करण्यात आलेल्या अशासकीय सदस्यांना विमान प्रवास तसेच रेल्वे वातानुकुलित प्रथम वर्गाचा प्रवास अनुज्ञेय राहणार नाही.

प्रस्तुत प्रकरणी होणारा खर्च मागणी क्र. "एम-२, मुख्य लेखाशिर्ष २४०८-अन्न साठवण व वखार साठवण (०४) ग्राहक संरक्षण अधिनियम, १९८६ अंतर्गत राज्य परिषद, राज्य आयोग आणि जिल्हा मंचाची स्थापना (०४) (०१) मुंबई शहर दत्तमत (२४०८०२५१)" या लेखाशिर्षाखाली दाखवावा व मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०११५२६१७९६०६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Bhaskar Baburao Patil

Digitally signed by Bhaskar Baburao Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Food Civil Supplier And Consumer Protection Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=bbb17268641691acddf048e6aa2150f79b022d09a6c745e92beb9baeed480e62, serialNumber=c8c342ac9a89937bf462ee75f46842ac6d1fbc12a95dda7bfd1d06d7b79b4191, cn=Bhaskar Baburao Patil
Date: 2018.12.01 17:21:21 +05'30'

**( भा. बा. पाटील )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. राज्यपालाचे सचिव
२. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. सर्व मंत्री आणि राज्य मंत्री यांचे खाजगी सचिव
४. सर्व विभागीय आयुक्त
५. महासंचालक माहिती व जनसपर्क संचलनालय, मंत्रालय,मुंबइ्र
६. महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा,मुंबई,(महाराष्ट्र-१)
७. महालेखापाल,लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा,नागपूर,(महाराष्ट्र-२)
८. सर्व जिल्हाधिकारी
९. मंत्रालयीन सर्व विभाग
१०.प्रबंधक, राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग,मुंबई
११.सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
१२.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१३.वित्तीय सल्लागार व उपसचिव,अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मुंबई.

१४. निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई.
१५. सर्व  प्रबंधक, जिल्हा ग्राहक तक्रार निवारण आयोग
१६. रोख शाखा, अन्न,नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग (३ प्रति)
१७. श्री. जोशी ओंकार सितारामपंत, १० बी, ग्रीनपार्क अपार्टमेंट, क्रांतीचौक उद्यानामागे, क्रांतीचौक, उस्मानपुरा, औरंगाबाद-४३१ ००५.
१८. श्री. पुरुषोत्तम सांभ अमिलकंठवार, सरस्वती सदन, रंगार गल्ली, गणपती मंदिराजवळ, नांदेड.
१९. निवड नस्ती, ग्रासं-२.